**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत जिल्हा कक्षातील ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील मंजूर अस्थायी पदांना दि.१.१०.२०११ ते २९.२.२०१२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय क्र.मबाआ-२०११/ प्र.क्र.७१/ का-७
नवीन प्रशासन भवन,३ रा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक :- २१ ऑक्टोबर, २०११.

**वाचा** :-१) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दि. ५ एप्रिल, २००३.
२) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ-२००३/प्र.क्र.४३८/का-६, दि.१४ जानेवारी, २००४.
३) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००५/प्र.क्र.२००(२)/का-६, दि.३१ मार्च,२००६.
४) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.एबावि-२००७/प्र.क्र.८२/का-६, दि.१६.१०.२००७.
५) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००८/ प्र.क्र. २३०/का-६, दि. १६ जुलै २००९.
६) केंद्र शासनाचे पत्र क्र.एफ-१४-९/२००५-सीडी-१, दि.८.५.२००९ व दि.९.३.२०१० चे पत्र.
७) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.एबावि-२००८/प्र.क्र.२३१/का-६, दि. १६.७.२००९.
८) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२०११/प्र.क्र.७१/का-७, दि. ३०.४.२०११
९) आयुक्त, महिला व बाल विकास सेवा आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. मबाविआ/आस्था/ एबाविसे/नाप्र/का-१/२०११/ ४२७९, दि.१३.१०.२०११ व दि.१८.१०.२०११.

**निर्णय** :- महिला व बाल विकास विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांमधील पदांचा आढावा घेवून सुधारित आकृतीबंध शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दि.५.४.२००३ अन्वये मंजूर केलेला आहे. सदर सुधारित आकृतीबंधानुसार मंजूर करण्यात आलेली पदे तसेच संदर्भाधीन महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२००५/प्र.क्र.२००(२)/का-६, दि.३१ मार्च, २००६, महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२००७/प्र.क्र.८२/का-६, दि. १६ ऑक्टोबर, २००७ व क्र. एबावि-२००८/प्र.क्र.२३१/कस-६, दि.१६.७.२००९ अन्वये नव्याने निर्माण करण्यात आलेली अस्थायी पदे विचारात घेवून तसेच केंद्र शासनाच्या दि.८.५.२००९ च्या पत्राने ३३ जिल्हा कक्षातील व शासन निर्णय महिला बाल विकास विभाग दि. १४.१.२००४ अन्वये प्रकल्पातील निश्चित केलेल्या आकृतीबंधातील मंजूर पदांच्या मर्यादेत एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत ४४९ ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील अस्थायी पदे तसेच अगंणवाडी सेविका व अंगणवाडी मदतनीस आणि मिनी अंगणवाडी सेविका अशी एकूण १,७५,४८८ मानधनी पदे दि.१.३.२०११ ते ३०.९.२०११ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन निर्णय दि.३० एप्रिल २०११ अन्वये मान्यता देण्यात आली होती.

२. उक्त प्रकरणी आता ३३ जिल्हा कक्षातील व एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत ४४९ ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील अस्थायी पदे तसेच मानधनी पदे दि.१.१०.२०११ ते २९.२.२०१२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

३. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग दि.१४.१.२००४ अन्वये प्रकल्प कार्यालयासाठी निश्चित केलेल्या आकृतीबंधाच्या अनुषंगाने ४४९ ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील ५२७२ अस्थायी पदे तसेच केंद्र शासनाच्या दि.८.५.२००९ व दि.९.३.२०१० मधील पत्रान्वये ३३ जिल्हा कक्षातील १२१ नियमित अस्थायी पदे तसेच एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत कार्यरत असलेलया ८१९४२ अंगणवाडयातील ८१९४२ अंगणवाडी सेविका व ८१९४२ अंगणवाडी मदतनीस व ११६०४ मिनी अंगणवाडी सेविका या मानधनी पदांना दि.१.१०.२०११ ते २९.२.२०१२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. सदर मुदतवाढ शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, दि.१४.१.२००४ अन्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधातील मंजूर पदांच्या मर्यादेत या आकृतीबंधाच्या फेरआढाव्याच्या व केंद्र शासनाच्या दि.८.५.२००९ व दि.९.३.२०१० अन्वये जिल्हा कक्षातील निश्चित केलेल्या आकृतीबंधाच्या सुधारित आढाव्याच्या अधीन राहून सदर अस्थायी पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे.

५. कें द्र शासनाच्या दि.८.५.२००९ च्या सुधारित स्टापिंग पॅटर्ननुसार आकृतीबंध निश्चित करणे तसेच दि.१४.१.२००४ च्या शासन निर्णयानुसार फेरआढावा घेणे आवश्यक आहे. त्यानुसार पूर्वीची मंजूर पदे व सुधारित स्टापिंग पॅटर्ननुसार मंजूर पदे लक्षात घेवून सुधारित प्रस्ताव तात्काळ पाठवावा. अन्यथा यापुढे सदर पदे पुढे चालू ठेवण्यास मान्यता दिली जाणार नाही याची नोंद घ्यावी.

६. सदर मुदतवाढ ही पदे ६ महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत असे उप आयुक्त (प्रशासन) महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी प्रमाणित केले आहे. उक्त प्रमाणपत्राच्या अधीन राहून सदर पदे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ४ ऑक्टोबर २००४ अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. (संगणक सांकेतांक क्र. २०१११०२११२१०१५००१)

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( शं.शा.पढाळ )
शासनाचे उप सचिव.

प्रति,
महिला व बाल विकास आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,
महालेखापाल महाराष्ट्र राज्य १/२ ( लेखा व अनुज्ञेयता ) ( लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,

संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
संबंधित उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण), जिल्हा परिषद
संबंधित जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, ठाणे
उप लेखा निरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, अमरावती
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई ,
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी
वित्त विभाग (का-व्यय-१४ / अर्थसंकल्प-१९ / वित्तीय सुधारणा -१), मंत्रालय, मुंबई.
ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
महिला व बाल विकास विभाग (का-४) आणि (का-६), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, का-७.